आदिवासी क्षेत्र उपयोजना सन २०१४-२०१५ चे राज्यस्तरीय (केंद्र हिस्सा) अर्थसंकल्प तरतुदीचे वाटप **"इंदिरा आवास योजना"**

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१४/प्र.क्र.२०/कार्यासन.६

**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**

तारीख: ०३ फेब्रुवारी,२०१५

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं -२०.१४/प्र.क्र.६६/अर्थ-३, दि.२९.३.२०१४.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज -२०.१४/प्र.क्र११०./अर्थ-३, दि०१..०७.२०१४.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज -२०१३/प्र.क्र८५./अर्थ-३, दि०२..०१.२०१५.

४) ग्रामविकास विभागाची नस्ती क्र.इंआयो २०१४/प्र.क्र.४३९/योजना-१०

**शासन निर्णय -**

आदिवासी उपयोजनांतर्गत **"इंदिरा आवास"** या उपशिर्षाखाली सन २०१४-१५ च्या अर्थसंकल्पीय अंदाजपत्रकात समाविष्ट करण्यात आलेल्या तरतुदीचे योजनानिहाय वाटप आणि नियंत्रण अधिकारी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविले आहेत.

२. सन २०१४-२०१५ करिताच्या अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी एप्रिल,२०१४ ते मार्च,२०१५ या आर्थिक वर्षाकरिता खर्च भागविण्यासाठी सोबतच्या विवरण पत्रातील स्तंभ क्रमांक २ मध्ये **"इंदिरा आवास"** या उपशिर्षाखाली २०१४-१५ च्या अर्थसंकल्पीय अंदाजात समाविष्ट करण्यात आलेल्या योजनानिहाय एप्रिल,२०१४ ते मार्च,२०१५ या आर्थिक वर्षाकरीता तरतूद दर्शविण्यात आली आहे. सदर तरतूद सन २०१४-१५ या चालू आर्थिक वर्षाकरीता खर्च करण्यास शासन मान्यता देत आहे. यासाठी उपलब्ध करून देण्यात आलेली तरतूद एप्रिल,२०१४ ते मार्च,२०१५ या आर्थिक वर्षाकरीता संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध कॅश फ्लो प्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी. तसेच सदर खर्च मासिक निधी विवरणपत्रानुसार खर्च करावा. मासिक विवरणपत्रानुसारचा निधी एप्रिल ते मार्च या कालावधीमध्ये पुढे-मागे ओढून घेण्याची सुविधा अर्थसंकल्पिय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.त्याचप्रमाणे सर्व नियंत्रक अधिकारी / अंमलबजावणी अधिकारी यांनी सदर तरतूदी खर्च करतांना वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अंदाज २०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०२.०१.२०१५ च्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी.

तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

४. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेत केलेली तरतूद खर्च झाली नाही तर सदर तरतूद प्रत्यार्पित करावी व कोणत्याही परिस्थितीत आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेची तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च झालेली आढळल्यास याबाबत आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, संबंधित जिल्हाधिकारी व नियोजन अधिकारी यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत जिल्हा योजनांसाठी उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती संबंधित विभागांनी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास व आदिवासी विकास विभागस प्रत्येक महिन्यात १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

५. विभागाच्या दिंनाक १६ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयाव्दारे जिल्हास्तरीय योजना जिल्हाधिकारी यांच्याकडे राबविण्यासाठी देण्यात आल्या आहेत. जिल्हा योजनांसाठी प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना देण्यात आलेले असल्यामुळे योजनेसाठी केलेली तरतूद त्याच योजनेवर त्याच जिल्ह्यात खर्च करणे बंधनकारक राहिल. त्यानुसार जिल्हा योजनेसाठी केलेली तरतूद जिल्हाधिकारी यांच्याकडे सुपूर्द करण्यात आली आहे. तथापि, हाती घेण्यात येणारी कामे संबंधित विभागातील क्षेत्रिय अधिकारी यांनी जिल्हाधिकारी, आयुक्त,आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त व प्रकल्प अधिकारी यांचेशी चर्चा करुन निश्चित करावी. प्रगतीपथावरील (ongoing works ) कामांपैकी ज्यामध्ये ५० टक्केपेक्षा जास्त खर्च झालेला आहे त्यांच्यावर खर्च करावा. अपवादात्मक परिस्थितीत अशी कामे ज्यावर ५० टक्के पेक्षा कमी खर्च झालेला आहे व त्यास पूर्ण करणे गरजेचे आहे त्याबाबत शासनाची पूर्व परवानगी घेऊन पुढील कार्यवाही करावी. तसेच जिहास्तरीय योजनेतील कामांची तपासणी करण्याचे अधिकार व जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी तसेच प्रकल्प अधिकारी, अपर आयुक्त व आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांची संयुक्तीकरित्या राहिल.

६. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे

नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्र शासनाला कळविता येईल.

७. नियंत्रण अधिकारी/विभाग प्रमुख यांनी नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन चालू योजनांवर खर्च करावा. हे आदेश फक्त अंमलबजावणी /नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या चालू योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची अंमलबजावणी अधिका-यांनी नोंद घ्यावी.

८. आदिवासी उपयोजनेअंतर्गत आदिवासी क्षेत्र उपयोजना (टिएसपी) व आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना (ओटिएसपी) यांचा खर्च स्वतंत्रपणे नोंदविण्यासाठी लेखाशिर्षामध्ये काही बदल करण्यात आले असल्यास हे बदल लक्षात घेवून खर्च नोंदविताना सुधारित लेखाशिर्ष नोंदविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०३१३३३१११५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Naik Suresh D

Digitally signed by Naik Suresh D
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=MTD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Naik Suresh D
Date: 2015.02.04 14:45:55 +05'30'

(सु. द. नाईक)
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती.

३. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

४. ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय (योजना-१०), मुंबई-३२.

५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

६. कार्यासन अधिकारी का.क्र.२ व १७ आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.

७. निवड नस्ती (का-६)

## आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील २०१४-१५ चे जिल्हानिहाय अर्थसंकल्पीय तरतूदीचे वाटप (टि.एस.पी.) (रुपये हजारात)

<table>
<tr><td colspan="2">शिर्ष : संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना<br>योजनेचे नांव : इंदिरा आवास योजना (केंद्र हिस्सा)</td><td colspan="3">मागणी क्रमांक टी-५<br>मुख्य लेखाशिर्ष : २५०५-ग्रामीण रोजगार-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-६०-इतर कार्यक्रम-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) इंदिरा आवास योजना (केंद्र हिस्सा)<br>(२५०५ २९९२) ३३, अर्थसहाय्य</td></tr>
<tr><th>जिल्हयाचे नांव</th><th>२०१४-१५ साठी केलेली तरतूद</th><th>२०१४-१५ ची अर्थसंकल्पीय तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी</th><th>प्रशासकीय विभाग</th><th>शेरा</th></tr>
<tr><td>१</td><td>२</td><td>३</td><td>४</td><td>५</td></tr>
<tr><td>एकूण</td><td>२१७५४००</td><td>प्रधान सचिव ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय</td><td>ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.</td><td></td></tr>
</table>

-------------